**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मातृ वंदना योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकाकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरमा २०२३/ई.ऑ.क्र.६३५०३६/प्र.क्र.३१२/कु.क.**
१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
दिनांक : २५ मार्च, २०२५

वाचा -

१) केंद्र शासनाचे मंजुरी आदेश क्र. PM-१५/२८/२०१७-PMMVY, दि.०५.०३.२०२५ (२ आदेश-CAS & New).
२) केंद्र शासनाचे मंजुरी आदेश क्र. PM-१५/२८/२०१७-PMMVY, दि.१८.०३.२०२५ (१ आदेश-CAS & New).
३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जा.क्र.राकुकका/PMMVY/शा.नि.नि.क./१२३४२-३४४/२०२५, दि. ०६.०३.२०२५ चे पत्र.
४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जा.क्र.राकुकका/PMMVY/शा.नि.नि.क./१४४१०-४११/२०२५, दि. १९.०३.२०२५ चे पत्र.
५) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जा.क्र.राकुकका/PMMVY/शा.नि.नि.क./१४९४०-९४२/२०२५, दि. २१.०३.२०२५ चे पत्र.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसंकल्प २०२४/प्र.क्र. १०८/ अर्थ-३, दि. ०८.०१.२०२५

**प्रस्तावना -**

प्रधानमंत्री मातृ वंदना ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून केंद्र व राज्याच्या सहभागातून राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र शासनाचा ६० % व राज्य शासनाचा ४० % आर्थिक सहभाग आहे. केंद्र शासनाने सन २०२३-२०२४ मध्ये योजनेच्या स्वरूपात सुधारणा केल्याने दुसऱ्या अपत्याकरिता द्यावयाच्या लाभापोटी सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाने

संदर्भ क्र. १ येथील २ मंजुरी आदेशान्वये केंद्र हिश्याकरिता मंजूर केलेला रु.७६,९९,०३,८७१/- (शहात्तर कोटी, नव्व्यान्नव लाख, तीन हजार आठशे एकाहत्तर फक्त) तसेच संदर्भ क्र.०२ येथील मंजुरी आदेशान्वये केंद्र हिश्याकरिता मंजूर केलेला रु.८,४७,५१,८५७/- (आठ कोटी सत्तेचाळीस लाख एकावन्न हजार आठशे सत्तावन्न फक्त) असा मिळूण रु.८५,४६,५५,७२८/- (पंच्याऐंशी कोटी शेहेचाळीस लाख पंचावन्न हजार सातशे अठ्ठावीस फक्त) इतका निधी (लेखाशिर्ष-२२११७५०१) तसेच केंद्र हिश्याच्या अनुरुप राज्य हिश्याचा ४०% नुसार रु.५६,९७,७०,४८५/- (छपन्न कोटी,सत्यान्नव लाख, सत्तर हजार चारशे पंच्याऐंशी फक्त) एवढा निधी (लेखाशिर्ष- २२११७३८८) असा मिळून एकूण - १४२,४४,२६,२१३/- ( रु. एकशे बेचाळीस कोटी चव्वेचाळीस लाख सव्वीस हजार दोनशे तेरा फक्त) इतका निधी सन २०२४-२५ च्या सुधारित अर्थसंकल्पीय तरतूदीतून संबंधीत यंत्रणेस वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री मातृवंदना योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी दुसऱ्या अपत्याकरिता द्यावयाच्या लाभापोटी केंद्र शासनाने सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात योजनेच्या सर्वसाधारण घटकासाठी मंजूर केलेला केंद्र हिश्याचा (आवर्ती) रु.८५,४६,५५,७२८/- (पंच्याऐंशी कोटी शेहेचाळीस लाख पंचावन्न हजार सातशे अठ्ठावीस फक्त) इतका निधी (लेखाशिर्ष-२२११७५०१) तसेच केंद्र हिश्याच्या अनुरुप राज्य हिश्याचा ४०% नुसार रु.५६,९७,७०,४८५/- (छपन्न कोटी,सत्यान्नव लाख, सत्तर हजार चारशे पंच्याऐंशी फक्त) एवढा निधी (लेखाशिर्ष- २२११७३८८) सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून संबंधीत यंत्रणेस वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेल्या निधिबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी राज्य आरोग्य सोसायटी-PMMVY यांच्याकडे योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या SNA खात्यामध्ये निधी वर्ग करावा. यासाठी सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दि. २५ जुलै, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र.९ मधील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन व शालेय आरोग्य पुणे यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २५ जुलै, २०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनी २०२२/प्रक्र. २७/२०२२/विनियम, दि. १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन व शालेय आरोग्य पुणे कार्यालयाच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या SNA मध्ये जमा झाल्यानंतर लाभपात्र लाभार्थ्यांच्या खात्यात थेट जमा करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात यावे.

६. मागणी क्रमाक आर-०१, २२११-कुटुंब कल्याण, (०२) प्रधानमंत्री सुरक्षित मातृत्व सहयोग कार्यक्रम, (०२) (०६) प्रधानमंत्री मातृ वंदना योजना (केंद्र हिस्सा ६० टक्के) (२२११ १५०१), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) व आर-०१, २२११-कुटुंब कल्याण, (०२) प्रधानमंत्री सुरक्षित मातृत्व सहयोग कार्यक्रम, (०२) (०१) प्रधानमंत्री मातृ वंदना योजना (राज्य हिस्सा ४० टक्के) (२२११ १३८८), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

७. सदर खर्च हा सशर्त असून, यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केले आहे तसेच कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तद्वतच प्राप्त निधीतून केलेल्या खर्चाचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदर निधी हा सन

२०२४-२०२५ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा, प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता संबंधित कार्यालयाने घ्यावी. सदर शासन निर्णय संदर्भ क्र.०४ येथील वित्त विभाग परिपत्रकातील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२५१२२९११२८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAIBHAV GAJANAN KOSHTI

Digitally signed by VAIBHAV GAJANAN KOSHTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=5749df8e46703e97e25555afe696d0a51badfa2373ccdc83593e18af18e92f1a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47C0ABB5437C6B09C621CCA6C499475684F37EA0F5529DD3EF3D6E6B3326E747, cn=VAIBHAV GAJANAN KOSHTI
Date: 2025.03.25 12:43:42 +05'30'

**( वैभव ग. कोष्टी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा १/२ मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई,
५. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
७. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०. वित्त विभाग, व्यय-१४/ अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प / लेखा), मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती (कु.क.)